महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (शिक्षण सक्षमिकरण शाखा) मधील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण <u>बदल्यांमध्ये अंशत: बदल करण्याबाबत-</u> अधिव्याख्याता

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : बदली ३१२०/प्र.क्र.६५ (भाग-१)/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ सप्टेंबर, २०२०

<u>वाचा</u>:-१) शा.शि.व क्री.वि., आदेश क्र.बदली-३१२०/प्र.क्र.६५/प्रशा-२, दिनांक ५ ऑगस्ट, २०२०

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार दिनांक ३१ मे, २०२० रोजी तीन वर्षाचा कालावधी पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या बदलीचे आदेश दिनांक ५ ऑगस्ट, २०२० रोजी निर्गमित करण्यात आले आहेत. त्यामध्ये काही अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्याचा निर्णय शासन स्तरावर घेण्यात आहे आहे. सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेल्या मान्यतेनुसार खलील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांच्या बदलीच्या पदस्थापनेमध्ये त्यांच्या नावासोर स्तंभ क्रमांक- ४ मध्ये दर्शविलेल्या सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| अनु क्र. | नाव व पदनाम | दिनांक ५ ऑगस्ट, २०२० अन्वये करण्यात आलेली पदस्थापना | अंशत: बदल करून सुधारीत पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती अपर्णा शंखदरबार, अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, नागपूर | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, वर्धा | विनंतीनुसार मान्य |
| २ | डॉ. राजेश माणिकराव चौधरी, अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, जालना | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, धुळे | अधिव्याख्याता, प्रादेशिक विद्या प्राधिकरण, औरंगाबाद | विनंतीनुसार मान्य |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | श्री. घन:शाम विठ्ठलराव पौळ, अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, लातूर | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, बीड | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, उस्मानाबाद | विनंतीनुसार मान्य |
| ४ | श्री. इमाम नजीर मिर्झा अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, बीड | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, उस्मानाबाद | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, लातूर | विनंतीनुसार मान्य |
| ५ | श्रीमती स्मीता पंडीतराव कापसे, अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, जालना | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, लातूर | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, बीड | विनंतीनुसार मान्य |
| ६ | श्री. चंद्रकांत अशोक पवार, अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, नंदुरबार | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, जळगांव | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, धुळे | विनंतीनुसार मान्य |
| ७ | श्री. भालचंद्र रमेश पाटील, अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, नंदुरबार | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, धुळे | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, नंदुरबार या पदावर एक वर्ष मुदतवाढ | विनंतीनुसार मान्य |
| ८ | श्रीमती मनिषा शंकरराव देवरे, अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, धुळे | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, नंदुरबार | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था, धुळे या पदावर एक वर्ष मुदतवाढ | विनंतीनुसार मान्य |

२. संबंधित अधिकारी हे दिनांक ५ ऑगस्ट, २०२० रोजीच्या आदेशानुसार संबंधित पदावर रूजू झाले असल्यास, हे आदेश अंमलात येणार नाहीत. आयुक्त (शिक्षण) यांनी याबाबत प्रथम खात्री करून नंतर वरीलप्रमाणे आदेश निर्गमित करावेत.

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१७१६०२१३३६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, postalCode=400032, street=ROOM NO 4.4,ANNEX BLDG,SCHOOL EDUCATION DEPT.MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2020.09.17 16:03:10 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, शिक्षण आयुक्तालय (मध्यवर्ती इमारत),महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सर्व शिक्षण संचालक
३) संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक
४) संबंधित प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्त्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
६) संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. निवडनस्ती, प्रशा-२